**राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यासाठी रु. २१० कोटी निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणे व रु. ३० कोटी निधी वितरीत करण्याबाबत.....**

महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-१०२३/ प्र.क्र.१११/८-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ३१ मे, २०२३

संदर्भ :

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक कृयायो-०८१८/प्र.क्र.२३१/१४ अे, दि.१२.९.२०१८
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र. ४३/अर्थ-३, दि. १२.४.२०२३
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक अंदाज २०२३/प्र.क्र.४४/२ अे, दि.१३.४.२०२३

प्रस्तावना :-

संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये, राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानातील घटक क्रमांक-३, वैयक्तिक लाभार्थी शेतकऱ्यांना कृषि औजारे/यंत्र खरेदीसाठी अनुदान देणे व घटक क्रमांक -४, कृषि औजारे/यंत्रे बँकाना अनुदान देणे या घटकांची अंमलबजावणी केंद्र शासनाच्या कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात येते.

राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची अंमलबजावणी महा डिबीटी पोर्टलवर कृषि यांत्रिकीकरण उप अभियान योजने अंतर्गत प्राप्त अर्जांमधून सोडतीमध्ये यशस्वी ठरलेल्या व कामे पूर्ण केलेल्या लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप करण्यात येते.

या योजनेसाठी सन २०२३-२४ या वर्षात रु. ३०० कोटी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या दि. १२ जून,२०२३ शासन निर्णयातील तरतुदीनुसार कृषि विभागाच्या दि. १३ एप्रिल, २०२३ च्या कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या १०० टक्के राज्य पुरस्कृत योजनांकरिता ७० टक्के मर्यादेत प्रशासकीय मान्यता व निधी वितरणाचे प्रस्ताव शासनास सादर करावेत असे निदेश दिले आहेत. त्यानुसार संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये कृषि संचालक (वि.प्र.) यांनी केलेल्या विनंतीस अनुसरुन, अर्थसंकल्पिय तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत रु.२१० कोटी निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणे व अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

१) सन २०२३-२४ या वर्षात राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी रू. २१० कोटी (रुपये दोनशे दहा कोटी फक्त) रकमेच्या कार्यक्रमास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) सन २०२३-२४ या वर्षात राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी रू. ३० कोटी (अक्षरी रुपये तीस कोटी फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्यात येत असून सदर निधी सन २०२३-२४ करिता खालील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र.डी-३,
२४०१-पीक संवर्धन,
(११३) कृषि अभियांत्रिकी,
(००) (१८) राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजना
(२४०१ ए ९१३) ३३ अर्थसहाय्य.

३) सदर योजनेंतर्गत ट्रॅक्टर या बाबीसाठी अनुसूचित जाती / जमाती, महिला, अल्प व अत्यल्प भू-धारक शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ५०% किंवा रु. १.२५ लाख यापैकी कमी असेल ते आणि इतर शेतकऱ्यांसाठी किंमतीच्या ४०% किंवा रु.१ लाख यापैकी कमी असेल ते या प्रमाणे अनुदान देण्यात यावे.

४) इतर बाबींसाठी योजनेची अंमलबजावणी करताना केंद्र पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे व संदर्भाधीन दि. १२ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करावे.

५) या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या रू. ३० कोटी निधीचे सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने, निधी आहरण व संवितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संतिरण अधिकारी |
|---|---|---|
| आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

६) सदर निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/नियम/परिपत्रक/ अधिकारांच्या मर्यादेत/C.V.C. तत्वानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही नियम/अधिकाराचा भंग होणार नाही याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

७) राज्य पुरस्कृत कृषि यांत्रिकीकरण योजनेची क्षेत्रीय स्तरावर अंमलबजावणी करण्यासाठी संचालक (वि. व प्र.), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, उद्दिष्टनिहाय अंमलबजावणी विषयक सविस्तर सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित

करावयात. तसेच महिला शेतकरी, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी भौतिक/ आर्थिक लक्षांक निर्धारीत करण्यात यावे.

८) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाकित दि. १२ एप्रिल, २०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन तसेच विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५३११२५६१५१००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2023.05.31 16:44:13 +05'30'

**( संतोष कराड )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री ( कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. सर्व सन्माननीय विधी मंडळ सदस्य, द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि), मंत्रालय,मुंबई-३२
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
५. संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण(, कृषि आयुक्तालय,पुणे
६. सर्व संचालक/सह संचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
१०.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
११.नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
१२.वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ), मंत्रालय, मुंबई -३२
१३.निवड नस्ती (कार्यासन -८अे), मंत्रालय, मुंबई -३२.